बुलडाणा व वाशिम जिल्ह्यातील चिखली, मेहकर, लोणार व रिसोड तालुक्यातील प्रमुख जिल्हा मार्ग रस्ते राज्यमार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२३/प्र.क्र.४२/नियोजन-२**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक - २८ फेब्रुवारी, २०२३

**पहावे** :- मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती यांचे पत्र जा.क्र./का-२(२)/रस्ते दर्जोन्नती-बुलडाणा/२०२३/४५०,दिनांक २४/०१/२०२३.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती यांनी संदर्भाधिन पत्रान्वये बुलडाणा व वाशिम जिल्ह्यातील चिखली, मेहकर, लोणार व रिसोड तालुक्यातील प्रमुख जिल्हा मार्ग रस्ते राज्यमार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे.

सदर रस्त्यांवरील गावांची संख्या, लोकसंख्या, रस्त्यांचा होणारा वापर मागणी विचारात घेता, सदर रस्ते राज्यमार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती यांचा प्रस्ताव विचारात घेऊन बुलडाणा व वाशिम जिल्ह्यातील चिखली, मेहकर, लोणार व रिसोड तालुक्यातील खालील प्रमुख जिल्हा मार्ग रस्ते राज्यमार्ग म्हणून दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | सामाविष्ठ रस्त्याचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | दहिगांव मंगरुळ नवघरे कळमेश्वर नायगांव दत्तापुर मोळा पिंप्रिमाळी मेहकर अंत्री देशमुख गुंधा बागुलखेड गुंजखेड वाकद रामा-२१४ ला जोडणारा रस्ता. | प्रमुख जिल्हा मार्ग- ९१ | (०/०० ते ३३/००) ३३.०० कि.मी. | ७०.५०० कि.मी. | **राज्यमार्ग क्रमांक-४६०** |
| | | प्रमुख जिल्हा मार्ग- ८५ | (०/०० ते १०/५००) १०.५०० कि.मी. | | |
| | | प्रमुख जिल्हा मार्ग- ८८ | (०/०० ते १४/५००) १४.५०० कि.मी. | | |
| | | प्रमुख जिल्हा मार्ग- १०६ | (०/०० ते ७/५००) ७.५०० कि.मी. | | |
| | | प्रमुख जिल्हा मार्ग- ५१ | (०/०० ते ४/५००) ४.५०० कि.मी. | | |
| | | प्रमुख जिल्हा मार्ग- ५८ | (०/०० ते ०/५००) ०.५०० कि.मी. | | |
| | **एकूण** | | | **७०.५०० कि.मी.** | |

परिणामी रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील बुलडाणा व वाशिम जिल्ह्यातील राज्यमार्ग रस्त्यांच्या एकूण लांबीत **७०.५०० कि.मी.** ने वाढ होवून राज्यमार्गाची एकूण लांबी (३४६२.६९० + ७०.५००) म्हणजेच **३५३३.१९० कि.मी.** इतकी होईल.

बुलडाणा जिल्ह्यातील प्रमुख जिल्हा मार्ग रस्त्यांच्या एकूण लांबीत **६५.५०० कि.मी.** ने घट होऊन एकूण लांबी (२८४६.४५० - ६५.५००) म्हणजेच **२७८०.९५० कि.मी.** इतकी होईल.

वाशिम जिल्ह्यातील प्रमुख जिल्हा मार्ग रस्त्यांच्या एकूण लांबीत **५.०० कि.मी.** ने घट होऊन एकूण लांबी (१०८८.३३० - ५.००) म्हणजेच **१०८३.३३० कि.मी.** इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०३०११२०५०५०३१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GANPAT SANDIPAN KACHARE

Digitally signed by GANPAT SANDIPAN KACHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3021bf955fefd71ffad5dd7c97769147f19aca6383a12fed6cff4849d78e224a, pseudonym=44879507A55BADCE1C62B2D52FC25354CE085DFF, serialNumber=B5B30AEBA818C77E43E7B8BA4BCA0E9F0D137FEAB0BBCB16CACF2D44087E8A76, cn=GANPAT SANDIPAN KACHARE
Date: 2023.03.01 12:09:15 +05'30'

**( ग. सं. कचरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, अमरावती.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
३) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, अकोला. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

**प्रत :-**

१) उप सचिव, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई.
२) जिल्हाधिकारी, बुलडाणा.
३) जिल्हाधिकारी, वाशिम.
४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, बुलडाणा.
५) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
६) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय.
७) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
८) निवडनस्ती.